श्री.

# तापी नदी.

परोपकारायवहंतिनद्यः

हें काव्य

केशव नारायण वैद्य

यांनीं रचिलें

तें



[नारायण] नरसिंह फडनीस यांनीं

जळगांव येथें नवीन पेठ घ. नं. २४ येथें आपल्या
बापजी प्रिंटिंग प्रेसांत छापून जळगांव येथें प्रसिद्ध केलें.

 सन १९१६.

# दोन प्रास्ताविक शब्द.

१ 'तापी नदी' या नांवावरूनच काव्यविषयाच्या रूपरेखेविषयीं वाचकांस अंदाजीक बोध होण्यासारखा आहे. हें काव्य वर्णनात्मक असून यांत तापीच्या उगमापासून तों तहत तिच्या मुखापर्यंतच्या प्रदेशांतील वर्णनीय देखाव्यांचा चित्रपट कवीनें रंगविलेला आहे.

२ वर्णनात्मक काव्याचे अनेक प्रकार आहेत त्यांतील एक साधा-प्रकार म्हटला म्हणजे चित्रकार आपल्या कुंचल्याच्या साहाय्यानें जी कामगिरी करितो, तीच कामगिरी कवीनें आपल्या वाणीनें करणें हा होय.

सरल शब्दांना छंदोमय सूत्रांत गुंफून वर्ण्यवस्तूची यथातथा प्रतिमा उठविणें हीच अशा काव्यांची कर्तव्यसीमा होय. लहान मुलें अगर कल्पनेच्या विरल किंवा भ्रामक वातावरणांत विहार करण्याची ज्यांस संवय नाहीं असे स्त्रीपुरुष यांना हीं काव्यें फार प्रिय होतात, कारण वर्णन विषयाचें प्रतिबिंब उत्तान असल्यामुळें ते प्रतीत होण्याला विलंब लागत नाहीं. या सरळ काव्यांत 'स्वभाव–रस' ओत–प्रोत भरलेला असतो व तोच आनंदाचा जनक होतो. 'स्वभाव–रस' हा शब्द ऐकल्या बरोबर वाचक बिचकण्याचा संभव आहे. 'स्वभावोक्ति अलंकार' त्यांच्या परिचयाचा आहे परंतु 'स्वभाव–रस' हा शब्द–प्रयोग अगदींच नवीन असल्यामुळें त्याचा थोडासा खुलासा करणें आवश्यक वाटतें.

३ 'छंदोमय रसात्मक प्रबंध' म्हणजे काव्य, अशी काव्याची थोडक्यांत व्याख्या देण्यांत येते. छंद आणि रस हे दोन्हीही काव्याचे आत्मेच आहेत, व या दुकलीपैकीं एकाचा जरी अभाव असला तरी

काव्य निर्जीवच होणार, यांत शंका नाहीं. या जोडीपैकीं रसाचा विचार करणें जरूर आहे. मनोविकारांचे आनंदांत पर्यवसान ह्मणजेच रस. मनाचे असंख्य किरण आहेत त्यांपैकीं कोणत्याही एका किंवा अधिक किरणांचें चलन होऊन सुख-संवेदन झालें ह्मणजेच रसोत्पत्ति झाली असें ह्मटलें पाहिजे. ज्या मनोवृत्तीचें उद्बोधन होऊन रसाविर्भाव होतो, त्याचें नांव त्या रसप्रकारास देण्याचा प्रघात आहे. संस्कृत साहित्यांत रसांची नऊ ही संख्या प्रसिद्ध आहे. परंतु-रंग, गाण्यांतील राग, आणि काव्यांतील रस यांची संख्या कायम करूं पाहणें ह्मणजे अशक्य गोष्ट शक्यकोटींत आणण्याचा प्रयत्न करणेंच होय. जोंपर्यंत मनाच्या वृत्ति अपरिमित आहेत, तोंपर्यंत रससंख्याही अपरिमितच राहणार. ह्मणूनच नव रसांनीं तृप्ति न होऊन त्यांस वत्सल या दहाव्या रसाची पुस्ती देण्यांत आली. त्यानंतर अलीकडे भक्तिरसाची जोड देऊन ही संख्या अकरावर खेंचण्यांत आली आहे. परंतु ही संख्या येथें तरी स्थिर कशी रहावी? तेव्हां परिचित वस्तूचें सरळ हुबेहुब वर्णन केलें असतां मनाला जो चमत्कार वाटून आनंद होतो त्याला आह्मी 'स्वभाव-रस' ही संज्ञा देतों.

४ वर दुसऱ्या कलमांत निर्दिष्ट केलेल्या काव्य प्रकारांत 'स्वभाव-रस' असतो व ह्मणूनच तीं काव्यें विशिष्ट वाचकवर्गास प्रिय होतात. परंतु अशा काव्यांत कल्पनेची भरारी, क्रीडा किंवा धांगडधिंगा नसल्या-मुळें त्यांस 'गद्यकाव्यें' हें नांव देऊन तुच्छ लेखण्याचा कांहीं टीका-कारांचा संप्रदाय आहे. इतकेंच नव्हे तर अशीं काव्यें लिहिणाऱ्या कवीस 'कविक्रीदक' या नामाभिधानानें भूषित करून, हीं काव्यें

महाराष्ट्र वाङ्मयांतून नाहींशीं होतील तोच सुदिन अशी आशा व्यक्त करून त्या कवींना तिलांजलि देण्यालाही एक टीकाकार विविधज्ञान-विस्तारांत अवतरले आहेत. परंतु जोंपर्यंत निरनिराळ्या दर्जाचे, स्वभावाचे, संस्कृतीचे वाचक वर्ग हयात आहेत तोंपर्यंत अशा राक्षसी टीकाकारांची ही घातक मनीषा पूर्ण होण्याचें चिन्ह दिसत नाहीं ही समाधानाची गोष्ट आहे.

५ वर्णनात्मक काव्याचा दुसरा प्रकार ह्मणजे वर्ण्य वस्तूचें उपमा-दृष्टांतादि अलंकारांनीं उठावदार चित्र रेखाटणें हें होय. या प्रकारांत कल्पनेला विहार करण्यास बराच अवसर मिळतो. वर्ण्य वस्तूची तत्सदृश अप्रस्तुत वस्तूशीं सांगड पडल्यामुळें तिच्या वर्णनास ठसकेदारपणा येतो. या काव्यप्रकारांत कवीचें चातुर्य, निरीक्षण, समयसूचकता, व सारासार विचार हीं चांगलींच कसोटीस लागतात अशा काव्याचें सौंदर्यही मुख्यतः वर्ण्य वस्तूच्या यथास्थित वर्णनावरच अवलंबून असते; ह्मणजे यांत स्वाभाविकता हाच मुख्य गुण आहे आणि त्यानेंच रसाचा प्रादुर्भाव होतो.

६ वर्णनात्मक काव्यांचा तिसरा प्रकार अतिशयोक्तिमय असतो. हा काव्यप्रकार काल्पनिक सृष्टीवर उभारलेला असतो. वर्ण्य वस्तूचें मूळचें वास्तविक स्वरूप सर्वस्वी बाजूला ठेवून कवि तिला आपल्या आवडीप्रमाणें अगदींच नवें स्वरूप देतो व या काल्पनिक स्वरूपानें निरनिराळ्या मनोवृत्तींना चालन देऊन तद्द्वारें रसोत्पत्ति करण्याचा प्रयत्न करतो. काल्पनिक सृष्टीचा बुरखा बाजूस ओढून वस्तुस्वरूप प्रकट केलें असतां कवीचें काव्य वेड्याच्या बरळण्यासारखेंच होतें. अर्थात अशा काव्या-

पासून खरा आनंद व्हावयाचा ह्मणजे वाचकालाही वस्तु स्थितीचें भान न राहून त्याचें मन कविसृष्टीशीं समरस झालें पाहिजे; आणि अशी वाचकांची स्थिति करून सोडणें यांत अशा काव्याचें वर्म व कवीचें कौशल्य आहे.

७ असो. वरील तीनही वर्णनात्मक काव्याचे प्रकार प्रस्तुतच्या कृतींत आढळून येतात.

प्रस्रवण वर्णन प्रसंग २, श्लो० २ ते ६; भूसावळी वर्णन प्र० ५, श्लो० १८ ते ३३; राकारजनी प्र० ४, श्लो० १ ते ६; बऱ्हाणपुरचा अग्नि-प्रलय प्र० ४, श्लो० ४० ते ५१; इत्यादि स्थलें पहिल्या प्रकारचीं उदाहरणें आहेत. शिशिरऋतूंतील देखावा प्र० ३, श्लो० २६ ते ४३; नदीवर्णन प्र० ३, श्लो० ७ ते १८; दावानलास चेतविणाऱ्या वाऱ्यास उद्देशून उद्गार प्र० श्लो० ४४ ते ५२; तापीकांठचा सुपीक प्रदेश प्र० ५, श्लो० ५ ते १७; इत्यादि स्थलें दुसऱ्या काव्यप्रकाराचे मनोहर मासले आहेत. तिसऱ्या प्रकारचे नमुनें पाहणें असल्यास वाचकांनीं पुढील स्थानें निरीक्षण करावीं:-- पर्वतास सोडून जाणाऱ्या नदीचे विचार प्र० २ श्लो० ११ ते १६, प्रवाहाच्या आड येणारे शिलाशकल प्र० २ श्लो० २८ ते ३२, सरित्सागर-संगम प्रसंगीं कवीचा नदीला उपदेश प्र० ५ श्लो० ७८ ते ८५.

८ कवि रा. वैद्य यांची ही प्रस्तुतची कृति हृदयंगम उतरली आहे ह्यांत शंका नाहीं. वर्णन करण्याची त्यांची हतोटी गंभीर व सरस आहे. भाषेंत ओज असून तिचा प्रवाह अस्खलित आहे. ' कवीनें संस्कृत

शब्दांचा उपयोग आपल्या काव्यांत फार केला आहे ' असा कांहीं टीकाकार ह्या काव्यावर शेरा मारतील हें आह्मी जाणून आहों. परंतु संस्कृत शब्दांचा कोणत्याही प्रकारें अतिरेक झालेला नाहीं. त्यांनीं उलट भाषेला प्रौढपणा व भारदस्तपणाच आला आहे. अशिक्षित वाचकांस हें काव्य सुगम होणार नाहीं, हें कबूल आहे. परंतु ज्यांचा प्रौढ वाङ्मयांत जरासा प्रवेश झाला आहे त्यांस यांत दुर्गम असें कांहींच वाटणार नाहीं, हेंही कबूल केलें पाहिजे. ' कवीनें अर्थबोधक टीपा जागोजाग दिल्या आहेत, यांतच काव्याचें हीनत्व दिसून येतें असें ' कित्येक टीकाकारांचें ह्मणणें आमच्या वाचण्यांत आहे, परंतु रघुवंशावर अर्थबोधिनी टीपा लिहिण्याचें मल्लिनाथास अवश्य वाटलें, सबब– कालिदासाचे ' रघुवंश ' टाकावूं होय हें विधान किती हास्यास्पद होईल याचा या टीकाकारांनीं विचार करावा. एकंदरींत भाषा काठिण्याचा दोष फिका पडतो यांत शंका नाहीं. जराशी प्रौढ भाषा योजणें हें कित्येक कवींच्या अंगवळणींच पडलें असतें पण त्यानें त्यांचें काव्य कृत्रिम किंवा रसहीन बनतें, असें मुळींच नाहीं,

९ प्रस्तुत काव्य अक्षरगण वृत्तांत रचिलें आहे, हीही एक समाधानाचीच गोष्ट आहे. कवीनें छंदोभंग किंवा शब्द–विकृति बहुशः कोठेंही होऊं दिली नाहीं हें त्यांस भूषणावह आहे.

मुरूड जंजिरा
३०–१–१९

बा. अ. भिडे.

# प्रकाशकाची प्रस्तावना.

पुष्कळ वर्षांपूर्वी तापी नदी ही कविता रत्नावलींत प्रसिद्ध झाली आहे. त्या वेळीं सदर कवितेचे सगळे प्रसंग प्रसिद्ध झाले नव्हते. सगळें तयार झालेलें काव्य वाचकांस मिळावें ह्या हेतूनें रत्नावलींत तें समग्र प्रसिद्ध झालें आहे. सदर काव्याचे कर्ते आमचे मित्र रा. रा. केशव नारायण वैद्य यांची भेट जळगांव येथें झाली, त्या वेळीं तापी नदीवर मी एक काव्य लिहिलें आहे असें त्यांणीं कळविलें. आमच्या आग्रहावरून त्यांणीं तें काव्य आह्मास प्रसिद्धीकरितां दिलें. याबद्दल आह्मी त्यांचे फार आभारी आहोंत. आपल्या काव्याची प्रसिद्धी होऊं नये, ह्या भीरु स्वभावाचे आमचे मित्र आहेत. तरी पण आमच्या आग्रहास त्यांणीं मान दिल्यामुळें वाचकांस ह्या काव्याचा लाभ झाला आहे. या काव्याच्या चांगुलपणाबद्दल रा. रा. बाळकृष्ण अनंत भीडे बी. ए. या रसिक कवीनें त्यावर प्रास्ताविक विवेचन केलें आहे. त्यावरून अनुमान होण्यासारखें आहे. आपल्या काव्यास किंवा ग्रंथास स्वतः कवीनें किंवा ग्रंथकारानें प्रस्तावना लिहिण्यापेक्षां ती दुसऱ्या रसिक गृहस्थानें लिहिलेली बरी ही कल्पना रा. रा. वैद्य यांची आह्मास ग्राह्य झाली व त्याप्रमाणें रा. रा. बाळकृष्ण अनंत भीडे बी. ए. यानीं आमच्या विनंतीस मान दिला याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहोंत. स्वतः कवीस चांगलीं स्थळें दाखवितांना आत्मश्लाघेचा दोष पदरीं येण्याचा संभव आहे. अशा वेळीं हा दोष टळण्यास दुसऱ्या रसिकाचा आश्रय महनीय आहे. शिवाय सदर काव्यास प्रसिद्ध डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेटर सोसायटीनें पसंती दाखल पारितोषकही दिलेलें आहे. ही गोष्ट कवीस भूषणावह आहे.

जळगांव चैत्र शुद्ध १ शके १८४१

संपादक, काव्यरत्नावली जळगांव.

# तापी नदी.

## प्रसंग पहिला.

ह्या कवितेस संस्कृत किंवा इंग्रजी लेखाचा मुळींच आधार नाहीं. ह्या नदीचा जो बराच भाग पाहण्यांत आला त्याजवर ही कविता रचली आहे. हिचे पांच प्रसंग ह्मणजे भाग करून त्यांत निरनिराळ्या स्थळांचें साद्यंत व सविस्तर वर्णन केलें आहे. ह्यांतील पहिलीं पांच पद्यें नमस्कृतिपर आहेत; त्यांत पहिल्यांत शिवाची, दुसऱ्यांत गंगेची, तिसऱ्यांत सर्व नद्यांची, आणि चौथ्यांत व पांचव्यांत वर्णिलेल्या "तापी नदीची" स्तुति करून नमस्कार केला आहे.

श्लोक.

जयानें वामांगीं सकल[1]गुणसौंदर्यभरिता -<br>
अपर्णा[2] प्रेमानें धरिलि, तरिही देवसरिता[3]<br>
गुणें रूपें मान्या ह्मणुनि निज शीर्षीं[4] धरियली<br>
शिवाच्या त्या पावो नमन मम हें पादकमलीं      १

कपर्दी[5] शंभूच्या तव भगवती ! वा हरिपदीं[6]<br>
नभीं पातालीं तें[7] मनुजभुवनीं[8] वा सुरनदी[9] !

---

१ सर्व गुण आणि सौंदर्य ह्यांनीं युक्त अशी. संबंध अपर्णा शद्बाकडे. २ पार्वती. ३ गंगा. ४ जटेंत. ५ गंगेचें विशेषण. ६ विष्णुपदाच्या ठायीं. ७ ह्याचा संबंध पुण्यस्त्रोत शद्बाकडे. ८ मृत्युलोकीं. ९ हे गंगे !

असो पुण्य[1]स्रोत त्रिदिशमनुजां वंद्य असुरां
तयाला सद्भावें नमन करितों जोडुनि करा
[2]नदीन स्वीकारें जलधिस जयांच्याचि वदती
पवित्रा तीर्थांची सतत असते जेथ वसती
सुधातुल्यें तोयें सकल जगता ज्या जिववितो
सरित्पादीं पावो स्तवनपर अल्पा मम कृती

तुझ्या स्नानें होई—मलिन तनु ही निर्मल, मन—
प्रसन्नत्वा पावे; सहज घडतें पापशमन.
तृषा वारी [3]वारी, सकल भवदुःखेंहि हरितें;
ह्मणोनी सद्भावें तुजसि नमितों पुण्यसरिते !

[4]नगाची तूं कन्या असुनि चपला कौतुक असे
तशी क्षाराब्धीची प्रियसखि तरी तद्[5]गुण नसे--
जलीं, संगें घेसी गुणचि, न कदां दोष लव ते;
ह्मणोनी सद्भावें तुजसि नमितों पुण्यसरिते !

जशी शालिग्रामीं कनकतनुरेषा विलसते,
गजेंद्राच्या [6]गण्डीं सुबक मदलेखा चमकते,
तशी विंध्याद्रीच्या वरि तव झरी रम्य तटिनी !
कशी शोभे, होई बघुनि किति आनंद नयनीं,

अहा ! तिथें विंध्यनगेंद्रबाले ! । किती तरी वारि तुझें झळाळे
विशुद्ध[7] वैडुर्य[8]मण्यांसमान । बघोनि होतें मन सुप्रसन्न
दोहों तिरीं सुंदर वृक्षराजी । वेष्टीयली पुष्पलतादिकीं जी
नानापरीच्या रमणीय वर्णीं । ती शोभते कोमल पुष्पपर्णीं

---

१ पुण्याचा स्रोत--झरा. २ समुद्र. ३ पाणी. ४ न हलणाऱ्या अचलाचे (पर्वताची.) ५ क्षारत्व. ६ गंडस्थलावर. ७ स्वच्छ. ८ रत्नविशेष.

जाई जशी सरल वक्र तुझी झरी ती
तीरद्वयीं तरुहि तेविं उभे रहाती
प्रेमें जणू निज मनोगत मूकभावें–
ते दाविती " न अमुतें सरिते! त्यजावें " ९

तूं मानिसी नच असें बघुनी निदानीं
ते वेष्टिती तरुलताहि तुला मिळोनी
बैसूनि गे! क्षणभरीं मग कुंज--कोशीं
मंजु स्वनें गमनहेतु तया कथीसी १०

प्रेमें जरी कथियला निज हेतु कानीं
मानीयलें किमपि त्या न वचा लतांनीं
त्या सोडुनी निज तरुप्रियवल्लभातें[1]
प्रेमें करीं कवळिती तुझिया झरीतें ११

ही लोभवी सकल ह्या ममता जगाला
मोहांत मुख्य बघ कारण लोटण्याला
प्रीती असे बहु हिला प्रिय--संगमाची
होई वियोग अति दुःसह फार जाची १२

जे धीर वीर डगती न नगेंद्र--भारें[2]
भंगे न यद्हृदय तें कुलिशप्रहारें[3]
स्नेहें द्रवे सहज चित्त परी तयांचें
व्हावें न कां? मग असें मृदुला लतांचें १३

स्नेहोचिता ह्या बघुनी लतांच्या। कृत्यांस, पंक्ती जलवेतसांच्या
प्रार्थावयातें तुजला, स्वभावें। ज्या नम्र त्या पावति नम्र भावें १४

---

१ वृक्षावरून उतरून प्रवाहांत पसरतात. २ पर्वताच्या भारानें.
३ वज्रप्रहारानें.

तूं तार कीं संहर वा दयाळे! । लोटूं नको दूर परी कृपाळे!
मानूं तुझ्या शर्म सुसंगतींत । राहूं सदा त्वद्विमला जलांत
पाहोनि त्यांचा शुचि नम्र भाव । तैसा अति प्रेमलही स्वभाव.
देसी तयां ठाव निजोदरांत । तूं दाविसी सज्जनलोकरीत

नगोच्च प्रांतींही मधुनि दरिच्या खेळुनि जरा
लतावृक्षाऐशी विपुल जलदात्री सुखकरा
नदी! होसी, तेथें प्रवहतटिचीं कोमल तृणें
सुखें भक्षोनीया किति विहरती स्वैर हरिणें
सलील क्षामांगी भुजंगगतिवक्रा गिरिवरी
तरूंतूनी वाहे पवनचपला ते तव झरी
बघोनीयां बाले! तुज कुतुहलें तात नग हा
गमे सोडोनीया निज परिसरीं खेळवि पहा
तुझा ज्यापासोनी अति विमलपूतोद्गम असे
प्रभातीं त्या भास्वान् तव जनकशीर्षी सुविलसे
तयाची दिव्या भा वसन जणुं तूं तेंच कसुनी
मुहूर्तानें या या निघसि गमतें नाथसदनीं
बघोनी पौरस्त्यांऽनिल निज गती मंद करुनी
तुझ्या संगें येई तव जनक—सन्मित्र ह्मणुनी

---

१ पुष्कळ उदक देणारी. २ लीलेनें युक्त असून कृशांगी. ३ सर्पा गतीप्रमाणें वांकडी तिकडी. ४ असमंत भागीं. ५ स्वच्छ आणि पवि असा उगम. ६ सूर्य. ७ मस्तकावर. (शिखरावर) ८ प्रभा—प्रका ९ नेसून. १० पूर्वेकडील वायु—ह्याला पर्वताचा मित्र कल्पून तो आपल मित्र कन्येस पतीच्या घरीं पोंचविण्यास जात आहे अशी अल्पना केली आ

करीती पुष्पांची तट--तरुलता वृष्टि जननी !
प्रयाणीं व्हावें तें तव शुभ असा हेतु धरुनी. २०

निघालीसी तूं हें बघुनि दुसऱ्या शैलतनया
तुझ्या संगें या या निघति नगराया[1] त्यजुनिया--
परी वाटे त्यांना तव पथ बहू दुर्गम असा
दुजा मार्गीं जाती ह्मणुनि मग घेवोन वळसा २१

अशा रीती तेथें सुखवुनि नगस्था स्थिरचरां[2]
क्रमें वाढोनीया हळुच पुढतीं निर्झर जरा
प्रपातीं[3] येताना प्रबलतर तत्छद्ब निघतो
दरींतूनी तैसा गिरिकुहरिं जाऊनि रिघतो २२

अत्युत्कंठा जरि तुज गमे नाथसद्मास जावें
पाहोनीया स्वजनममता चित्त तें मोह पावे
धैर्ये त्यांतें[4] दृढ करुनि तूं पर्वतांकावरोनी
मोठ्या कष्टें निघसि सकलां दीर्घ शद्बें पुसोनी २३

दे आमंद्रें[5] तुज अनुरवें[6] शैल आशिर्वचातें
गाती पक्षी बसुनि विटपीं कूजितें[7] त्वद्गुणांते
प्रेमें नृत्या करिति सवधू मेघनादानुलासी[8]
शाखाहस्तीं अनुमत तरू देति ते जावयासी २४

अशी शैलोत्संगांवरुनि[9] अति वेगें अटुपनी
गमे मातें जाई प्रवह तव पाताल भुवनीं

---

१ पर्वताला. २ पर्वतावरील वृक्षलता पशू आदिकरून ह्यांस. ३ जेथून तेचे पाणी खालीं पडतें तें स्थान. ( धबधबा ) ४ चित्तातें. ५ गंभीर. ६ प्रतिध्वनीनें. ७ मधुर शद्बांनीं. ८ मयूर ज्याना मेघाच्या शद्बाची प्रीति आहे असे. ९ पर्वताच्या अंकावरून ( कड्यावरून. )

सुशीता सुस्वादा विमल रुचिरा पाप शमना
अशा ये घेऊनी पुनरपि वरी सुंदर गुणां

" मी पावना गोड विशुद्ध वारी, । माझें असे शील परोपकारी
'तापी' मला कां वदतात लोक, । माते! जरी तूं ह्मणशील, ऐक "-

निदाघीं मध्यान्हीं प्रखर किरणीं वासरमणी--
तपे, तूंही माते! तपसि बहु तेव्हां स्वपुलिनीं
अनायासें तेव्हां नच तव जल प्राप्त पथिकां
अशा हेतूंनीं ते वदति तुज 'तापी' न अणिका

दयालुत्वें चित्तीं सुजन खल कांहीं न बघतां
दिला सर्वां ठांवो धरुनि उदरीं थोर ममता
स्वदुष्कृत्यीं लावी परि खल तुझ्या दूषण मुग्धा
अशा ह्या हेतूंनीं वदति तुज 'तापी' न अणिका

बहू वर्षाकालीं प्रवह तव वाढोनि तटिनी!
तटस्था ग्रामांच्या अवचित शिरे रम्य सदनीं
तयां विध्वंसोनी जलमय करी तो सकलिका
अशा ह्या हेतूंनीं वदति तुज 'तापी' न अणिका

तिरीच्या क्षेत्रीचें सुपिकपण तूं निर्दयपणें
लया नेवोनीया सकल करिसी तेथ पुलिनें
करीसी क्षोभानें सहज निमिषीं रंक धनिका
अशा ह्या हेतूंनीं वदति तुज 'तापी' न अणिका

प्रचंडा लाटांचा भयकर असा जो ध्वनि निघे
निशीथीं येवोनी पुरयुवतिकर्णीं झणिं रिघे

---

१ वाळवंटांत. २ ठाव. ३ मगरादिक. ४ वाळवंटें.

भिवोनी त्या नाथा कवळिती तदा, जेविं लतिका—
द्रुमा, ह्या हेतूंनीं वदति तुज 'तापी' न अणिका ३१

होती जनास अपकार तुझ्या मुळें जे। बोलावयास जननी! मम चित्त लाजे
मी जाणतों लव न ह्यांत तव प्रमाद। वाटे परी बघुनि थोर अनर्थ खेद ३२

मी बोलल्यों तुजसि निष्ठुर निंद्य फार। माते! क्षमा करिं परी अपराध थोर
दे बुद्धि निर्मळ तुझे गुण गावयाला। दावावया सदुपयोग तुझा जनांला ३३

---

## प्रसंग दुसरा.

### प्रस्रवण वर्णन.

#### श्लोक.

जेथूनीया तव उतरला ओघ वेगें वरून
होतें स्तब्ध क्षण मन तिथें भोंवताली बघून
हर्ष क्रोध प्रणय ममता खेद संकोच भीती
ऐशा नानाविध उठति त्या अंतरंगांत वृत्ती १

कोठें उग्र क्षितिधरशिरें उंच वैराण थोर
कोठें भीतिप्रद पसरलें रुक्ष कांतार घोर
कोठें मोठ्या भयकर दऱ्या, कीर्र झाडी जयांत;
होतें ज्यांच्या जनमन सकृद्दर्शनें भीतियुक्त २

कोठें सों सों प्रलेंयसमयातुल्य वारा वहातो
धो धो धो धो प्रवहरव त्यामाजि संमिश्र होतो
कोठें क्रूर प्रबल करिती श्वापदें घोर शद्ब
सर्वांचा तो गिरिकुहारिं ह्या, होतसे थोर नाद ३

---

१ अद्रिरूपा असा दुसरा पाठ. २ प्रलयकालाप्रमाणें.

कोठें शूलाकृति[1] दिसति त्या पाहुनी दंतकांला[2]
औदासिन्यें हृदय भरुनी खिन्नता ये मनाला
कोठें काळे कटक[3] उघडे दाविती क्रूर वृत्ती
शैवालानें पिहितेंहि[4] कुठें सौम्य ते भासताती

गेलें जेथें सुकुन जल, तो पांडुरें[5] प्रांत झाला
भासे आला जणु धवलिमा त्वद्वियोगें नगाला
कोठें[6] ओला दिसत उदकें भाग पाहून त्यातें
स्नेहार्द्रा तो नग निज मनोवृत्ति दावी जनातें

पाही येथें कठिण खडकाच्यामधूनी जलाचे--
बिंदू मंदाश्रुचि गळति हे त्वद्वियोगें नगाचे
अज्ञ, ज्ञाता, सदय अथवा क्रूर हो का विवेकी
ज्या वात्सल्यें द्रव न सुटतो कोणि ऐसा न लोकीं

हा ! हा ! माझी सुगुण सरिता चालली एकटी ही
बाळे ! मागें मुरडुनि तरी एकदा ह्यांस[7] पाहीं
धो धो ऐशा नगवर तुझ्या निर्झरानुर्ध्वनीनें--[8]
बोले भासे, अधिकचि गमे तेथ औदास्य तेणें.

आल्या प्रेमें मिळुनि तव ह्या दर्शनेच्छा धरून
झाल्या--भावि[9] स्मरुनि विरहा डेंकड्या फार खिन्न
कोणी तीरा पसरुनि तुझ्या स्वांग लंबायमान
येती, कोणी वघति धरण्या त्वत्पथा आडवून

---

१ शूलाकार. २ पर्वताच्या तिर्यक् प्रदेशांतून निघालेले सुळके. ३ कडे. ४ आच्छादित. ५ पांढऱ्या वर्णाचा. ६ "वाटे" असें पाठांतर. ७ पर्वत स्वतःस उद्देशून ह्मणतो. ह्यास ह्मणजे मला मजकडे असा अर्थ. ८ प्रतिध्वनि. ९ पुढें होणारा.

त्यांचा होई विफल बघुनी यत्न ते हासतात.
वाटे चित्तीं कुटज अपुल्या--फुल्ल जे दीसतात
वृक्षीं शद्धा करुनि खग तत्खेद ते दाविताती
अन्योन्या ह्या विसदृशं अशा नीचसद्वृत्तरीति ९

येथें लीला विविध तुझिया निर्झराच्या बघून,
कोंदे नादें स्थल सकल तच्छद्ध तो आयकून,
भासे माते ! वदसि अपुल्या हेंचे कीं तूं मनाशीं
बालत्वाच्या सकलहि सुखा आठवोनी गिरीशीं. १०

" अहा इथुनिया सुटे जनकसत्पदाब्जाश्रय
तसा सकृप अंतरे सुखद तो मला तच्छये
घडेल न कधीं असा प्रियजनीं पुन्हा वास हा
जरी सहज शैशवीं मजसि लाभला तो पहा ११

करून बहु लालना मज नगें अहा ! पाळिलें
करून ममता किती शिशुपणांत संरक्षिलें
शिरीं भुजशिरीं कटीवरि कुतूहलें घेतलें
अहा ! सकल सौख्य तें मजसि आज दूरावलें १२

सुपुत्र तरुं धन्य ते त्वदुदरांत घेवोनिया--
पित्या ! जनन राहती, क्षण न जाति सोडोनिया--
तुला, तुजसवें सुखा--सुख सदा पहा भोगिती
नगत्व तव धर्म तो ह्मणुनि त्या न उल्लंघिती १३

---

१ उलट. २ नीच आणि सज्जन ह्यांच्या रीति. ३ प्रवाहाच्या. पुढें सांगितलें आहे तेंच. ५ त्याचा कर (हात) ६ खांद्यावर. तरु हेच तुझे [ पर्वताचे ] चांगले पुत्र. ८ हे बाबा पर्वता. ९ अचलत्व.

बरें पुरुष--जन्म तें सुचिर[1] तातसत्संगती
घडे, नच घडे तशी प्रिय असोन कन्येप्रती
वसेल जनकालयीं सतत कन्यका ती जरी
अकारणहि त्या जन प्रकट निंदिती ते तरी
अनंत उपकार बा! मम[2]--शिरीं तुझे जाहले
परी न लव मात्रही सुख पित्या! तुला मी दिलें
अतीव अनुताप हा मम मनास संताप दे
वघेन कधिं हीं पुन्हा तव सुशांत दिव्यें पदें
वनीं परिसरीं[3] तुझ्या पशु--विहंगमीं ह्या द्रुमीं
यथेच्छ बहु खेळलें सतत आजपर्यंत मी
कशी? जनपदस्थिती मज न रीतिही ठावकी
रुचोन सकलांस जी उचितमान्य हो लौकिकीं
तुझें परिसुनी असें वचन शैल तो बोलतो--
" न भी[4] धरि सुते! तुला परिस एक जें सांगतों
" जन त्रिविध हे असे, बहुविधा तशी तत्कृती[5]
" सुबुद्धि वरिं सत्पथा धरिं परोपकारीं मती "
पडे वरुनिया उडे जल पुन्हा तुझें तें वरी
पुन्हा हळुंच खालतीं पडुनि अद्रिपादांवरी
गमे करुनि भक्तिनें पुनित तत्पदक्षालना
स्वकीय विमलें जलें, करिसि तूं तया वंदना
तिथून निघसी जरी नच परी तया सोडिसी
पुनः प्रणयनिर्भरें कवळुनी तया भेटसी

१ नेहमी. २ माझ्यावर--हे नदीचे उद्गार आहेत. ३ समीपभाग. ४ भीति. ५ जनांची कृति.

अतीव ममता अशी स्वजनकीं तुझी पाहुन
गमे मज, तुला वृथा वदति शैलजा[1] जे जन १९

येथें तुझें संपुनि बाल्य[2] माते ! । प्रारंभ होतो जणु यौवनातें
त्यां शैशवाची[3] उँबगोन[4] वृत्ती । मुग्धा--स्थितीते[5] वरिते झरी ती २०
बाल्यासवें मूढपणा लयातें । संशुद्धता त्याजसवेंचि जाते
ज्ञानासवें कृत्रिमता शिरून । टाकी मना दूषित तें करून २१
औत्सुक्य लोलोत्सुक मानसातें तें प्रेमवृद्धीप्रतिही करीते
प्रीति, त्रपा, कल्प, विचार चित्तीं उद्वेग तैशी शिरतेहि भीती २२
बाल्येतरा[7] वृत्ति गमे धरावी । होई परी निश्चित तीं[8] न ठावी
मुग्धा तयें हो स्थिति जी मनाची । छायाच कीं ती मकरध्वजाची[10] २३
फेंसाळुनीया[9] जल सर्व गेलें । प्रेमोद्गमें नैक तरंग आले
कल्लोल[11], ओवर्तहि[12] त्यांत होती । मुग्धा स्थिती ते तव दावितातीं २४

ऐशी तुझी क्षुभित वृत्ति सुहृद्वियोगें[13],
जी होय चंचलहि संशयिता[14]ऽनुरागें[15]

---

१ शैलजा हें पद श्लिष्ट आहे. शैल ह्मणजे पर्वत तो कठोर हृदयाचा (ज्याचें हृदय पाषाणांनीं भरलेलें ) अर्थात् त्याची कन्या ह्मणजे कठोर मनाची--दुसरा--शैलजा [ पार्वती ] ही आपल्या दक्षप्रजापति पित्याविषयीं प्रीतिपराङ्मुख होती, ह्मणून तुला शैलजा ह्मणतात तें व्यर्थ--तूं ममताळू आहेस. हा भाव. २ पूर्वीं वर्णिलेल्या. ३ बाळपणाच्या. ४ टाकून. ५ बाल्य आणि तारुण्य यांच्यामधील अवस्था. ६ सरल निःशंक स्वभाव. ७ बालवृत्तीहून निराळी. ८ वृत्तीकडे संबंध. ९ वेडावून--गोंधळून गेलेली. १० मदनाची. ११ लाटा. १२ भोंवरे. १३ प्रियजनांच्या वियोगानें. १४ साशंक. १५ प्रीतीनें.

तीतें विवेक करुनी मनिं शांतवोनी
तूं चालसी निज गती पुढतीं धरोनी
तें धावणें दडदडा सुटलें इथून
ते खेळ बाळपणचेहि तसेच जाण
अंकावरी जननिच्या अथवा पित्याच्या,
स्वच्छंद तें विहरणें मधिं पादपांच्या.

आतां तुझा करुनि ओघ अनेक धारा
चाले पुन: मिळवुनी सगळा पसारा
ते गण्डशैल[1] तुज तेविं शिला विशाला
येती पथांत सरिते! जणु भेटण्याला
" स्वस्थान सोडुनि तुह्मी गमना[2] समर्थ--
आलांत कां नसुन[3] हो तरि दूर येथ?
सौख्यें रहा नगवराजवळी पित्या त्या
द्या शर्म[4] शांत सदया निज जन्मदात्या "

प्रेमें असें वदुनिया, परिरंभ द्याया
धाराकरा[5] पसरुनी, मग शांतवाया
त्या न्हाणिसी निज जलें, जननी! मनातें
आनन्द ही कृति तुझी नयनास देते

जातां पुढें क्रमुन मार्ग, बहूत येती--
पाषाण सान अडवे, बघ दीसताती;

---

१ पर्वतावरून गडवडून त्याच्या तळवटीं पडलेले मोठे द
२ जाण्याला. ३ समर्थ ह्या शब्दाशीं संबंध--समर्थ नसून असा
४ सुख. ५ प्रवाह रूप धारा हेच हात.

आश्चर्य खेदहि तसा तुज हर्ष झाला
त्या पाहुनी चिमकुल्या नगबालकांला ३०

आलांत कां? त्यजुनि येथवर स्वताता,
नेऊन कोण परतोन तुह्मास आतां
घालील त्याजवळ, ' काय बरें असें हें '
जा मागुते जनक जों नच दूर आहे ३१

तीं अर्भकें न तव मान्य वचा करीती
मार्गीं तुझ्या सकल येउन बैसताती
झांकून तोय--वसनीं धरिसी तयांतें
तूं स्वोदरांत, पुढतीं क्रमिसी पथातें ३२

तरु लता गिरिराज दरी शिला
मृग शिखी निजउत्सहि टाकिला
त्यजुन दूर वनाद्भुत निम्नगे !
जनपदस्थलिं ह्या शिरलीस गे ! ३३

---

## प्रसंग तिसरा.

निर्जन अरण्य सोडून लोकवस्तीच्या प्रदेशांत आल्यावर, तिचें वरूप; गती, स्थिति आणि शोभा ह्यांचें आणि तेथून सहज दृष्टीस पडणाऱ्या सातपुडा पर्वताचें व वसंतकालापूर्वीं समीप भागीं असणाऱ्या तेथील नस्थितीचें ह्यांत थोडें बहुत दिग्दर्शन करून, अशा कालांतही केवळ दीच्या पाण्यावरच होणाऱ्या नदीच्या पात्रांतील खरबूजवाड्या तरबूजवाड्या ांचें ह्यांत थोडेसें वर्णन दिलें आहे.

## तापी नदी.

### श्लोक.

चला सुजन हो ! नमूं सकल--मंगला--दायिनी
भरूनि नयनें बघूं प्रथम दृक्पथाऽल्हादिनी[1]
त्यजून जनकादिकां[2] जनपदांत[3] ह्या पातली
पुरीं[4] उपवनीं[5] जिचीं उभयही तटें शोभलीं
नमो भवविमोचिनी[6] ! तुज सुधा जल--स्यंदिनी[7] !
नमो वन--विहारिणी[8] ! जनपदा--भिसंचारिणी[9] !
जनोपकृतिकारिणी[10] ! सकल--जीव--संजीवनी[11] !
नमो--मति रमो तुझ्या सुगुण--वर्णनीं--ल्हादिनीं[12] !
भगीरथ--तपें[13] जनीं प्रकट होय मंदाकिनी[14]
जनोद्धरण कारणा परि तुझी झरी पावनी[15]
स्वयें प्रकटुनी जना सुखद लाभ दे आपुला
ह्मणोन जन हा सदा तव सुवर्णनीं रातला[16]
दिनें बहुत जाहलीं तुज न मी नदी ! भेटलों
प्रपंचअटवींत ह्या भटकतां श्रमी जाहलों

---

१ दृष्टीला संतोष देणारी. २ पर्वत जो नदीचा जनक त्याल तेथील स्थिरचरांना. ३ लोकवस्तीच्या ठिकाणीं--देशांत. ४ नगरांनीं. वागांनीं. ६ संसारबंधापासून सोडविणारी. ७ अमृताप्र० उदक वाहण ८ वनांत क्रीडा करणारी. ९ जनपदांत संचार करणारी. १० लोक उपकार करणारी. ११ सर्व जीवांचें संजीवन करणारी. १२ हे न ह्या दोन पद्यांत हीं सर्व तिचीं विशेषणें असून संबोधनें आहेत. भगीरथाच्या तपःप्रभावानें. १४ भागीरथी पृथ्वीवर आली अशी कथा तिला उद्देशून हें ह्मटलें आहे. १५ पवित्र. १६ रमला.

क्षमा करिं, करीं धरीं, शरण दीन आलों तुला–
पवित्रतवदर्शनें सुकृत शांति लाभो मला ४

खचीत नच मीं नदी! प्रथम ओळखीलें तुला
किती त्वरित गे ! तुझा प्रवह थोर हा जाहला
शरीरचि न त्यासवें गुणहि रम्यता वाढली
सुभव्य तनु यौवनें तव पहा कशी ? शोभली ५

पुरा[1] विकट दुर्गमें[2] गिरिशिरिं नभश्चुंबितें[3]
विशाल बहु खोल त्या भयदही दऱ्या गे ! जिथें–
पडे पवन चालतां सहज तोहि घोटाळुनी
भयंकर अशा स्थळीं निपटें[4] निर्जनीं काननीं ६

धडाधड उड्या कड्यावरुनि टाकुनी धांवत
झरी तव तरंगिणी[5]! गिरि--गुहोदरीं गर्जत
क्रमी पथ जवें परी त्यजुनि रीति ते संप्रती
धरी दिसतसे इथें सरळ शांत मंदा गती ७

अशक्त तव शैशवीं तनु कृशा बहू धाकली[6]
परी अंतटिं[7] ही न ती द्रुतगती[8] तुवां टाकली
शरीर कृश अल्पही बल असून उल्लंघिला
गिरी, प्रवह येथ कां ? मज कळे न मंदावला ८

वनीं भटकतां श्रमें मज गमे बहू भागली
झरी क्षणभरी इथें ह्मणुनि ही तुझी थांबली
अशीच उचिता असे गति संतीस[9] वा यौवनीं
गजेंद्रगंति[10] काय ही ह्मणुनि घेसि तूं ऱ्हादिनी ! ९

---

१ मागें पूर्वी. २ जाण्यास कठीण. ३ आकाशांत गेलेलीं. ४ केवळ. ५ नदी. धाकटी. ७ धबधब्याचे ठिकाणीं. ८ चपल गती. ९ साध्वीला. १० गजगती.

पुढें पसरला दिसे ऋषिपुटाद्रि[1] हा उत्तरे[2]
नभीं दिसतिं उंच तीं किति उभारलीं तच्छिरें[3]
अनेक नग हे गमे मिळवुनी तव स्वागता
गिरींद्र[4] जणु पातला दिसतसे जसा त्वत्पिता[5]

किती सरळ वांकडे नग असे उभे राहती
किती मधुनि काढुनी शिर हळूच डोकाविती
किती धवल नील ते हारित वर्णही ते किती
अहा! तरुलतादिकीं पिहित रम्य जे भासती

कुठें दिसति उंच ते भयद उग्र काळे कडे
कुठें मधुनि त्यावरी बिकट दुर्ग[6] दृष्टीं पडे
उभे कितिक खेटुनी बघति एकमेकांकडे
कुठें तुटुनि हो दरीमधुनि दोन दोहीकडे

यदा त्यजुनि चालले बहुत खेद ज्या वाटला
पिताच मम विंध्य तो ह्मणुनि येथ कीं पातला
असें क्षणभरी तुला बघुनि वाटलें अंतरीं
तुझी स्थिर ह्मणून ही चकित शांत कीं हो झरी

स्वतांतसख[7] हा असें समजलें जरी गे! तुला
बघून जनकाप्रिया[8] तुजसि हर्षही जाहला
तरी स्वपथ रोधुनी धरिल हीच शंका तुला
गमे, ह्मणुनि येथ हा प्रवह काय मंदावला

---

१ सातपुडा पर्वत. २ उत्तरेस. ३ पर्वताचीं शिखरें. ४ पर्वत श्रे[ष्ठ]
५ तुझा जनक विंध्याचल. ६ किल्ले. ७ आपल्या बापाचा मि[त्र]
८ बापाच्या मित्राला.

पडेल[1] जनता सुखा पथ धरीयल्या कोणता
घडेल जनिं ह्या कशा अचरणें दया मान्यता
गभीरहृदये![2] [3]ह्रदीं वसुनि निश्चलें मानसें
विचार करिसी तुझ्या स्थितिवरून ऐसें दिसे १५
तुझ्या विहरती जलीं चपल मीन नाना गती
विलोल-नयना-वधू-नयन-विभ्रमा[4] दाविती
सुमंद पवनें जलीं मृदुल वीचि[5] ज्या ऊठती
सुरम्य युवतींचिया भ्रुकुटिच्याचि[6] त्या आकृती १६
क्षण स्थिर दिसे, दिसे तव झरी क्षणें कांपिता
कधीं विमल शांतशी, कधिं तरंगरोमांचिता[7]
कुठें सरळ चालली, करुनिया कुठें भोंवरा
फिरे गरगरा गमे शिरुनि भेदिते कीं धरा १७
कुठें विनयशालिनी प्रकुपिता कुठें जाहली
झरी अचल खिन्नशी रुसुनिया तुझी बैसली
दिसे, स्तिमितशी[8] कुठें चकित ती कुठें भासते
प्रसन्नवदना कुठें रमवि रम्य--मंद--स्मितें[9] १८
जरी तव झरी अशा विविध मुग्धलीला करी
असे विमल पूत ती तरि सबाह्य अभ्यंतरीं
कृतींत युवती सती मधुर[10] भाव त्या दाविती
परी दुरितवासना कधिं तयां शिवेही न ती १९

---

१ लोक २ गंभीर आहे हृदय जीचें [ हें संबोधन आहे. ] ३ डोहाचे जागीं. ४ चंचल नेत्रांच्या स्त्रियांचें दृष्टि चांचल्य. ५ लाटा. ६ रागानें चढलेल्या भवयांच्या. ७ तरंग हेच रोमांच त्यानीं युक्त. ८ स्तब्ध. ९ मनोहर अशा मंद हास्यानें. १० सुंदर ११ मनोहरण करणारे.

सुशील, रुचिरत्व ही मधुरता, दया, सद्‌गुण
असून रमणीय तें विलसतें जिथें यौवन
धनप्रबलता सदा असुनि शांत राहे मन
पहा सकल हे कसे ? मिळति तेथ लोभें जन
विलोल नयना कृषीवलवधू[1] मृगांकानना
प्रभातसमयीं तुझ्या विमल न्यावया जीवना
मिळोनि निघती करीं[2] धरुनिया शिरीं घागरी
परस्पर कथोनिया सुखविती गुंजा[3] सुंदरी
असा स्वपथ बोलतां हळु हळू तिहीं सारिला
परी न निज गोष्टिचा कथनभोंग[4] तो संपला
तटानिकट त्या तुझ्या बसुनि बोलती अंतरीं
गमे समजुनी तुला कथिति दुःख मातेपरी
मुली चिमकुल्या करीं धरुनिया शिरीं तांबल्यों[5]
कशा दडदडा तुझ्या धरुनिया पथा धांवल्या
जलांत शिरतां तुझें जळ हळूच हेलावतें
हसेंचि तुज ये असें बघुनिया मनीं वाटतें
सुरम्य तट तें तुझें सलिल—वैभवें शोभलें
इथेंच जन हे तुझ्या प्रयत[6]--दर्शनें जाहले
परोपकृतिहेतु गे ! सुफल जाहले ह्या स्थलीं
तुझे, सकल पूर्ण तीं जनमनोगतें जाहलीं
अहा ! तुजशिं बोलतां पथहि काल हा लोटला
बराच, मज वाटतें शिशिर हा ऋतू पातला

---

१ शेतकऱ्यांच्या स्त्रिया. २ हातांनीं. ३ गुज गोष्टी. ४ सांग[illegible] जोगा भाग ( कथानक ) ५ लहान लहान तपेल्या बटुकुली. ६ पवित्र.

दिसे नभ कसें पहा दिसतसे वनश्री तशी
सुरम्य गिरिचीं शिरें दिसति तीहि आतां कशीं २५

पर्णे गळोनि सगळीं द्रुमांचीं । गेलीं तशी कोमलता लतांचीं
आतां पहा शैशिर-वात वाहे । तो दुःख त्यांतें बहु देत आहे २६
गांठोनि रानीं जणु तस्करांनीं । कीं घेतलीं तद्वसनें हिरोनी
या कारणें दिग्वसना त्रपेनें । ते राहती नेसुनि खिन्न मौनें २७
किंवा गतश्री मिळण्या पुन्हा ते । उष्णीं उभे राहुनिया तपातें
एकाग्र चित्तीं धरुनी करीती । कोणी विनम्रा सरलाहि रीति २८
सौंदर्य जें कीं अवघ्या तनूचें । कीं एक तें साधन रम्यतेचें
जें मुख्य वा लक्षण वैभवाचें । गेलें गळोनी ह्मणुनी शिखींचें २९
ते वृंद जाऊन नगोदरांत । चिंता तयाची बसती करीत
पुनःपुन्हा ती गतवैभवाची । हो दुःखदा त्या स्मृति तापदाची ३०
जेथें पुरा वैसुनि दृक्पथाला । संतोषदा वाहिलि मेघमाला
केकारवें उत्सुक मानसानें । ये ये अशा ती परमादरानें ३१
छायाद्रुमीं बैसुनि ज्या प्रमोदें । केलें वना नादित आत्मशब्दें
जेथें प्रिया--मानस--रंजनाला । केलें पुरा सुंदर--नर्तनाला ३२
ती शैलशृंगें तरु तेच आतां । देती तया खेद अहा ! पहातां
तारुण्य गेल्यावरि रूप जैसें । किंवा गत--श्री नृपतेज तैसें ३३
जेथोनिया स्वच्छ जलौघ होते । धो धो सदा वाहत हो ! कडे ते
टाकोनिया पूर्व दयार्द्र भाव । तो दाविती उग्र निज स्वभाव ३४

---

१ शिशिर ऋतूंतील वारा. २ त्यांचीं झाडांचीं वस्त्रें. ३ दिशा हेंच
वस्त्र. ४ लज्जेनें. ५ समुदाय. ६ ताप देणारी. ७ मोराचा शब्द. ८ छायेचे
वृक्ष. ९ आपल्या शब्दांनीं. १० प्रिया जी लांडोर तीचें मन रमविण्या
करितां. ११ पूर्वी.

क्रोधानलें निर्झर शोषुनी ते । कीं जाळिती स्वांगरुहा[1] लतांतें
कैशा पहा नीरस शुष्क झाल्या । खालीं कड्यांनीं जणु लोटियेल्या
जेव्हां विपत्काल समीप येतो । प्रारंभ त्याचा कलहांत होतो.
अन्योन्यवैरा जन जे करीती । ते आत्मनाशाप्रति हेतु होती
जेव्हां विपत्काल वनास आला । प्रारंभ तेथें कलहास झाला
तेणें कसे थोर अनर्थ झाले । प्रत्यक्ष वंशीं[2] बघ दावियेले
एकाच वंशांतुनि[3] जन्म घेती । एकाच भूमीवरि वाढताती
ज्यांची कृती एकचि एक रीती । एक स्वभावा सगळे धरीती
ज्यांच्या असे तें सरलत्व अंगीं । जे दीसती सर्व समानरंगी[4]
शोभावना सुंदर फार देती । मंजूळ शब्दाप्रति ते करीती
जे एकमेकांस सहाय होती । एकत्र सारे मिळुनी रहाती
त्यांनींच आतां कलहा करोनी । उत्पन्न केला बघ हा वनाग्नि
वसंत ज्या मित्र समीरणाला[5] । मानी अहा ! तोच सहाय झाला
दावानला[6] सर्व वनांत न्याया । वसंतवैरा[7] सजला कराया
वाहोनि जो मंद सुगंध नेई । जनीं वना सौख्यद फार होई
घेऊन पृष्टीं सर्जला[8] घनातें । जो सिंचिण्या नेइ अशा वनांतें
लताद्रुमांचा सुमभारभोक्ता । तो गंधलोभी करणार आतां
होळी अहा ! सुंदर काननाची । इच्छाच ही कीं ? जगदीश्वराची
जेव्हां तुला तो अनुकूल होता । रे ! काल तेव्हां सखया ! वसंत
वायू तुझा मित्र ह्मणून राही[9] । संद्मीं[10] तुझ्या स्वागतलाभ घेई

---

१ आपल्या आंगावर चढलेल्या. २ कळक वेळू ह्यांनीं. ३ कुळ अथवा एकाच कळकापासून. ४ रंगांनीं सारखे. ५ वायूला. ६ रानांतील वणवा. ७ वसंताचें शत्रुत्व. ८ जलानें भरलेल्या मेघाला. ९ रहात अ १० तुझें घर जें वन तेथें.

कुंजांत गुंजारव भृंगराजी । पुष्पांवरी बैसुनिया करी जी
वारून ती दूर निज प्रवाहें । रंगोनि हा तेथ खुशाल राहे ४५
उत्फुल्ल[1] त्या सुंदर पारिजातों[2] । वायो ? कसा रे ? स्मरसी न आतां
प्रेमें जयानें बहु पूर्व कालीं । त्वत्स्वागतीं ती सुमवृष्टि केली ४५
नेता करा सन्निध मानवा जे । संकोच पावे मनिं फार लाजे
मानी परी स्पर्श तुझा सुखाचा । केलास हा शेवट कां तियेचा[3] ४७
ज्या सुंदरा कोमल चारु गात्रा । रम्यालता पुष्पित--हास्य[4]--वक्त्रा
घेऊन त्यांच्या भर सौरभांचा । केलास कां शेवट हा तयांचा ४८
उद्दामगंधा[5] रुचि'ा सुवर्णा । वर्णे पहा लाजविते सुवर्णा[6]
जी त्या रसज्ञा रासिकाहि भृंगा । नेदी करूं स्पर्श कधीं निजांगा ४९
ऐशी अहा ! गंधफली सती ते । स्पर्शें तुझ्या फुल्ल सदैव होते
वायो ! तिचा तेवि तिच्या पित्या[8]चा । केलास कां शेवट ह्यापरीचा ५०
वातें हरोनी द्रुमपल्लवातें । त्या दीधलें फेंकुनिया लतांतें
खालीं नगापासुनि सिद्ध झाला । दावानलें तो वन जाळण्याला ५१
पुरा शिवाच्या नयनानलानें । होमीयला मित्र अनंग ज्यानें
धरून दावानलरूप तोची[11] । रक्षा कराया सजला वनाची ५२
पाहून ऐसें अपुल्या मनांत । हा भीत[12] झाला बहु कीं वसंत
सोडोनि तेणें दिधलें वनाला । आला नदी ! तो तुझिया तटाला ५३

---

१ फुलल्लेला. २ पारिजातक वृक्षाला. ३ लाजाळू वेलीचा. ४ फुलांनीं [फु]लणें हेंच ज्यांचें हास्य वदन अशा. ५ उद्दाम आहे गंध जीचा. ६ सोन्याला. [७] सोनचाप्याची कळी. ८ सोनचाप्याच्या झाडाचा. भ्रमर सोनचाप्याच्या [फु]लावर बसत नाहीं अशी प्रसिद्धि आहे. ९. शंकराच्या ललाटावरील [ने]त्रांतील अग्नीनें. १० मदन हा वसंताचा मित्र मानला आहे. ११ तोच [अ]ग्नि. १२ भ्याला.

भीतास धीरा-[1]भय नित्य द्यावें । निराश्रिता आश्रय ह्याच भावें
प्रेमें तुवां त्या जननी वसंता । वाटे दिला कीं मज ठाव आतां ५
प्रचंड[2]--चंडांशु--कर--प्रतापें । कसें तुझें सैकत[3] थोर तापे
न मृत्तिकेचा कणही मुळाशीं । न बिंदु वर्षे घन तो जलाशीं ५
असा बहू दुस्तर काळ आला । लताद्रुमांच्या जरि जीवनाला
तरी तुझें पीयुषतुल्य वारी । करी कृपा दुःख समग्र वारी[4] ५
अन्नाविना मातृपयोंचि[5] बाळें । तीं वाढतीं बाळपणीं कृपाळे !
मेघोदकावीण तुझ्या जलानें । लताद्रुमीं हीं भरलीं पुलीनें ५
तो थोर वारि--प्रवहा--भिमान[6] । जी चालली नीट गति त्यजून
अत्युत्कटेच्छा प्रिय संगमाची । सोडूनिया आवडही मनाची ५
प्रेमें त्रपा[7] सोडुनि मान सारा । माता शिशूच्या स्तन--दुग्ध--धारा
घाली मुखीं[8], तूं निज वारि तैशी । ते सोडिशी नेउनि तन्मुळाशीं[9] ५
अहा ! किती कोमल रम्य पर्णीं[10] । तीं शोभतीं चित्र अशा सुमांनीं[11]
किती तरी सुंदर तीं फळें या । गे ! लागलीं सत्वर शोभवाया ६
वसंत देतो नव पल्लवातें । कोणास पुष्पेंहि फळें कुणातें
फळें फुलें पल्लव एक काळीं । ऋतूंत एका परि ह्यांस[12] आलीं ६
कैशी पहा आणियली तयांनीं[12] वसंतशोभा तुझिया पुलीनीं[13]
दिसे तुझें पात्र विचित्र वर्णी । आच्छादिलें सुंदर गालिचांनीं ६
तुझ्या जलें नैक करून धारा । व्यापीयला सैकतभाग सारा

---

१ धैर्य आणि अभय. २ प्रखरतर सूर्याच्या तीव्र किरणाच्या तापानें ३ वाळवंट. ४ निवारण करी. ५ आईच्या आंगच्या दुधावरच. ६ प्रवाहाचा अभिमान. ७ लज्जा. ८ मुखांत ह्या शब्दाचा संबंध शिशूच्या ह शद्बाकडे. ९ वृक्षलता ह्यांच्या मुळाशीं. १० सुंदर पानांनीं. ११ विचि फुलांनीं. १२ लतादिकांस, लतादिकांनीं. १३ वाळवंट.

वेलीस त्या मानुनिया स्वबाळें । मध्यें तयांच्या तव तोय खेळे ६३
पाहून ह्या त्वत्कृतिवैभवाला । आनंद झाला सकला जनाला
नाना पशू नैकविहंगजाती । प्रेमें तटीं त्या तव सर्व येती ६४
गंगा सहस्त्रां[1] वदनीं प्रियातें । रत्नाकरातें मिळण्यास जाते
जेथें तिथें सुंदर जी वनाची । शोभा दिसे कीं मज येथ तेची ६५
माते! सरित्संगमें–सुंदराते[2] । तुझ्या तटीच्या सुभग[3] स्थळांतें
तैसें दिसे जें पुर अग्रभागीं । दावी अह्मातें पुढल्या प्रसंगीं ६६

---

## प्रसंग चवथा.

### वसंतराकारजनी.

ह्याचा प्रारंभ वसंत ऋतूंतील चांदण्या रात्रीच्या वर्णनापासून केला असून ह्यांत वऱ्हाणपूर शहराचें, तापी, पयोष्णी (पूर्णा) ह्या नद्यांच्या संगमांचें, आणि श्रीक्षेत्र चांगदेव ह्यांचें वर्णन दिलें आहे.

श्लोक.

आनंद दे विमल पूर्ण शशिप्रकाश– । चित्तास, तेवि तव रम्य तटप्रदेश
ती स्वच्छ शांत रजनी रजनीकरांच्या[4]– । योगें[5] गमे प्रमुदिता प्रमदा[6] पतीच्या १
तो हालवी उदक मंदमरुत्प्रवाह[7] । दे मोद मोदकर शीतल गंधवाह[8]
तीं सैकतें[9] जलहि घाट तुझ्या तटाचे । वाटे अहा! निलयं[10] तें सुख कौतुकाचें २

---

१ जेथें भागीरथी सहस्त्र मुखांनीं आपला प्रियकर जो सागर त्यास मिळते, त्या वनाची शोभा. २ नद्यांच्या संगमानें शोभणाऱ्या ह्याचा संबंध स्थलाकडे. ३ भाग्यवंत येथें प्रयत असा दुसरा पाठ घेऊन त्याचा अर्थ पवित्र असा केल्यासही होईल. ४ चंद्राच्या. ५ संयोगानें. ६ स्त्री. ७ मंद वाऱ्याची झुळुक. ८ आनंद देणारा व सुगंध वाहून नेणारा शीतल वायु. ९ वाळवंटें. १० स्थान. [घर]

घेऊन संघ निजसंगति तारकांचा
हा पातला पति तुझ्या सदनीं निशेचा[1]
हें[2] स्वर्णदीसहित रम्य तुझ्या जलांत
शोभे पहा गगन भव्य विशाल शांत
आकाश, तेज, पवनोदक, भूतधात्री
एकत्र येथ अपुल्या मिळवून पात्रीं[3]
वाटे प्रदर्शन तुवा मज मांडलें कीं
अन्यत्र दुर्लभ जयासम भूमिलोकीं[4]
तें बिंब चंचल जळीं शशिचें बघून
येतीं कितीं जलचरें जवळी, पळून–
जातीं त्वरें भिउनि दूर तया प्रभेनें
साल्हाद तीं विहरतीं किति कौतुकानें
उद्यान रम्य, तरु सुंदर, सुंदरा त्या–
झाल्या लता कुसुमिता[5] बहु तोष देत्या
तैसें दिसे नगर दुर्गहि जो समोर
पाहून मोद सुख विस्मय होय थोर
हा थोर दुर्ग तरि कोठुनि येथ आला
हीं मंदिरें सुखद सुंदर चंद्रशाला
वाडे प्रचंड नगभव्यधनाढ्यहर्म्यें[6]
तैशीं सुरम्य सदनें नृपराजकाम्यें[7]

---

१ रात्रीचा पति (चंद्र) २ आकाश गंगेसुद्धां. (संबंध गगनाकडे) ३ पात्रांत. ४ मृत्युलोकांत. ५ पुष्पित. (फुललेल्या) ६ पर्वताकार दिसणारे वाडे व धनांनीं भरलेलीं व्यापाराचीं घरें. ७ राजे लोकांनीं ही ज्यांची इच्छा धरावी असे.

चिंती मनीं नगर सुंदर कोणतें हें
जें दृक्पथा दुरुनि तोषद होत आहे
कोणी ? कधीं ? वसविलें नृप येथ कोण ?
सांगून कोण ? मम काम करील पूर्ण. ८

सोत्कंठ[1] चित्त मम त्यांत गढून गेलें
शोभावलोकनसुखीं[2] रममाण झालें
कानीं ध्वनी मधुर एक तशांत आला
ओढोनि नेइ तिकडे मम दृङ्मनाला[3] ९

तों पाहिली भरजरी दुकूला[4] कसून
जी उत्तरीय[5] पट घेइ शिरावरून
ये मंद मंद पद टाकित कामिनी ते
दे तोष दर्शन जिचें बहु मन्मनातें १०

ती हंसचारुगमना[6] तुझिया तटाला
येवोनिया करिं,[7] करीं अभिवंदनाला
सारी मुखाऽवरण[8]–सुंदर–उत्तरीया
प्रेमें तुझा प्रयत–दर्शन–लाभ[9] घ्याया ११

चंद्रानना सुदति[10] नूतन कंजनेत्रा[11]
बिंबाधरा[12] भगवती मृदु चारुगात्रा

१ इच्छा. २ ती शोभा पहाण्याच्या सुखांत. ३ माझी दृष्टि आणि मन ह्यांना. ४ भरजरी रेशमी वस्त्र (पितांबर नेसून) ५ जिनें मस्तकावरून उत्तरीय वसन घेतलें आहे. (मुख झांकून घेतलें आहे) ६ हंसगामिनी. ७ हातांनीं. ८ बुरखा. ९ तुझ्या पवित्र दर्शनाचा लाभ. १० सुंदर आहे दंतपंक्ति जिची. ११ नव्या कमलाप्रमाणें जिचे डोळे आहेत ती. १२ पिकलेल्या तोंडवळ्याप्रमाणें जिचे ओठ आहेत ती.

# तापी नदी.

जी भव्य सुंदर सुधाकरकांतिमूर्ति[1]
दे मोद कौतुक मना सुमनोहरा ती
ही कोण ? रम्यवनिता वनदेवता कीं ?
दिव्यांगना त्यजुनि ये दिवें[2] मर्त्यलोकीं
किंवा जलामधुनि ही फणिराजबाळा[3]—
आली, कळे न मजला तव दर्शनाला
किंवा करीं धरुनि ह्या वैरवर्णिनीतें[4]
हा इंदु सुंदर—पयोनिधि—कन्यकेतें[5]
त्वद्वृत्त[6] सर्व कथितां, मुदिता जहाली
ती, दर्शनास तव काय ह्मणून आली
तों गर्जतात गगनीं जणु काय अंब्द[7]
होई जलामधुनि तेवि गभीर नाद
त्यांतून शद्ब पुढचे श्रवणांत[8] आले
तेणें अतीव[9] मम सद्गद चित्त झालें
ये ! ये ! अशी जवळ ये ! लडिवाळ—बाळे !
ये ! भेटलीस तनये ! मज दीर्घ[10] काळें
आहेस कीं कुशल ? वृत्तहि सांग सर्व
संकोच लाज भय सोडुनि अन्यभाव[11]
ऐकून ती मधुर मंगल मंजु वाणी
जें बोलली विमलसद्गुणरूपखाणी

---

१ चंद्राच्या तेजाची मूर्तिच अशी. २ स्वर्ग लोक ३ नागकन्या ४ सुंदरीला. ५ आपली बहीण लक्ष्मी तिला. ६ तुझी ( तापी नदीविषयीं ७ मेघ. ८ कानांत. ९ फारच. १० फारा दिवसांनीं. ११ संकोच भीति लाज, परकेपणा टाकून.

